शिर्डी ता. राहाता, जि. अहमदनगर येथे माहे मार्च, २०२३ मध्ये राज्यस्तरावरील पशु-पक्षी प्रदर्शन आयोजित करण्यास प्रशासकीय मान्यता, त्याप्रित्यर्थ येणाऱ्या खर्चास वित्तीय मान्यता व त्यासाठी रु.३.७४ कोटी निधी बीडीएस वर वितरित करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक- राज्ययो- २०२२/प्र.क्र.१४/पदुम-२**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- २४ फेब्रुवारी, २०२३

वाचा:- १. कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचा शासन निर्णय क्र. राज्ययो-२०१२/प्र.क्र.३०१/पदुम-४, दि. ३१.०१.२०१३

२. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र. भाखंस-२०१४/प्र.क्र.८२/ भाग-III / उद्योग-४, दि.०१.१२.२०१६

३. आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांचे कार्यालयीन पत्र क्र. विस्तार/ प्र.क्र.१६८/विस्तार शासन निर्णय/२८३/२०२१, पसं-१३, पुणे- ६७ दि.०७.०१.२०२२.

४. आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांचे कार्यालयीन पत्र क्र. विस्तार/ प्र.क्र.१६८/विस्तार शासन निर्णय/९६००/२०२१, पसं-१३, पुणे- ६७ दि.०६.०७.२०२२.

५. आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांचे कार्यालयीन पत्र क्र. विस्तार/ प्र.क्र.१६८/विस्तार /७९/२०२२, पसं-१३, पुणे- ६७ दि.०२.०१.२०२३

६. शासन पत्र समक्रमांक दि. १०.०२.२०२३

७. आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांचे कार्यालयीन पत्र क्र. विस्तार/ प्र.क्र.१८९/विस्तार शासन निर्णय /२२४४, पसं-१३, पुणे- ६७ दि.१४.०२.२०२३.

**प्रस्तावना:-**

माहे मार्च, २०२३ मध्ये शिर्डी ता. राहाता, जि. अहमदनगर येथे राज्यस्तरावरील पशु-पक्षी प्रदर्शन आयोजित करणे प्रस्तावित आहे. सदर प्रदर्शनासाठी राज्यातील तसेच, राज्याबाहेरील **जातीवंत** पशु-पक्षी तसेच, त्यांचे शास्त्रोक्त पध्दतीने संगोपन करण्यासाठी आवश्यक यंत्रे, उपकरणे, औषधी तसेच, पशुसंवर्धनाशी निगडीत बाबींसाठीच्या उत्पादनांचे स्टॉल उभारणे, जातीवंत पशु-पक्षांमधून सर्वोत्कृष्ट पशुधनाची निवड करुन पशुपालकांना सन्मानित करणे, पशुपालकांची प्रदर्शन पाहण्याची व्यवस्था करणे व इतर अनुषंगीक बाबी करणे प्रस्तावित आहे.

प्रदर्शनाच्या माध्यमातून देशी गोवंश संवर्धनाचे महत्व पटवून देवून, देशी गोवंशामध्ये अनुवंशिक सुधारणा घडवून आणणे, सुशिक्षित बेरोजगारांना पशुपालनाद्वारे स्वयंरोजगाराच्या संधी उपलब्ध करुन देणे व त्यायोगे ग्रामीण अर्थव्यवस्था बळकट करणे, दूध, मांस व अंडी उत्पादनास चालना देणे, जनावरांची उत्पादन क्षमता वाढवून उत्पादन खर्च कमी करणे, लिंग विनिश्चित केलेल्या विर्यमात्रांचा कृत्रिम रेतन कार्यक्रमात वापर, वैरण उत्पादनास चालन देणे, मुरघास/ हायड्रोपोनीक्स/ अझोला तंत्रज्ञान या सारख्या विषयांबाबत

पशुपालकांना सदर प्रदर्शनात तज्ञांकडून मार्गदर्शन करण्यात येणार आहे व त्यामुळे पशुपालकांचे उत्पन्न दुप्पट होण्यास मदत होणार आहे.

शिर्डी, ता. राहाता, जि. अहमदनगर येथे माहे मार्च, २०२३ मध्ये राज्य स्तरावरील पशु-पक्षी प्रदर्शन आयोजित करण्यास प्रशासकीय मान्यता तसेच, येणाऱ्या खर्चास वित्तीय मान्यता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

१. शासन निर्णय कृषी व पदुम विभाग दिनांक ३१/०१/२०१३ अन्वये राबविण्यात येणारी "पशुसंवर्धन विस्तार आणि प्रसिध्दी/प्रचार कार्यक्रम" ही योजना पुढे सुरु ठेवण्यास याव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

२. शिर्डी ता. राहाता, जि. अहमदनगर येथे माहे मार्च, २०२३ मध्ये राज्य स्तरावरील पशु-पक्षी प्रदर्शन आयोजित करण्यास याद्वारे शासनाची प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. तसेच या प्रित्यर्थ येणा-या रु.३.७४ कोटी खर्चास शासनाची वित्तिय मान्यता प्रदान करण्यात येत असून सदरचा निधी बीडीएसवर वितरित करण्यास याद्वारे शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

३. उपरोक्त प्रमाणे येणारा खर्च खालील नमुद लेखाशिर्षांतर्गत सन २०२२-२३ मध्ये उपलब्ध निधीतून भागविण्यात यावा.

**रु.लाखात**

| **लेखाशिर्ष** | **बाब** | **अर्थसंकल्पीय तरतूद** | **वितरीत करावयाची तरतूद** |
|---|---|---|---|
| मागणी क्र.डी-४<br>२४०३, पशुसंवर्धन,<br>१०९, विस्तार व प्रशिक्षण<br>(००)(१०) प्रदर्शन व प्रचार (१००% राज्य योजना)<br>सांकेतांक २४०३ ०८७५ (कार्यक्रम) | २६ जाहिराती व प्रसिध्दी | रु. ७०.०० | रु. १४.०० |
| | ५० इतर खर्च | रु. १८००.०० | रु. ३६०.०० |
| | एकूण | | रु ३७४.०० |

४. सदर प्रदर्शन माहे मार्च, २०२३ मध्ये आयोजीत करावयाचे असल्याने प्रकरणाची तातडी विचारात घेता सदर प्रकरणी विविध बाबी उपलब्ध करून घेण्यासाठी निविदेचा मसुदा जिल्हा स्तरावर अंतिम करुन निविदा प्रक्रिया राबविण्यास व दर अंतिम करण्यास खालील प्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे:-

i) जिल्हाधिकारी, अहमदनगर - अध्यक्ष
ii) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अहमदनगर - सदस्य
iii) अतिरिक्त आयुक्त पशुसंवर्धन, पशुसंवर्धन आयुक्तालय, पुणे - सदस्य
iv) प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त, नाशिक विभाग, नाशिक - सदस्य
v) उद्योग उपसंचालक (तांत्रिक) गट-अ तथा महाव्यवस्थापक,
जिल्हा उद्योग केंद्र, अहमदनगर - सदस्य
vi) जिल्हा पशुसंवर्धन उप आयुक्त, अहमदनगर - सदस्य सचिव

५. उपरोक्त समितीने घेतलेले निर्णय वेळोवेळी शासनास अवगत करावेत.

६. सदर राज्यस्तरीय प्रदर्शन आयोजित करण्यासाठी उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय दि.०१.१२.२०१६ सोबतच्या सुधारित माहिती पुस्तिकेमधील तरतूदींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. सदर प्रयोजनार्थ होणाऱ्या खर्चाबाबत रकमा आहरीत करण्याचे अधिकार, तसेच अंमलबजावणीचे अधिकार जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, अहमदनगर यांना राहतील.

७. सदर प्रदर्शनाच्या अनुषंगाने निविदा प्रक्रिया राबविणेबाबत शासन परिपत्रक वित्त विभाग दि.०९.०२.२०२३ च्या परिच्छेद-४ येथील अटीस वित्त विभागाच्या सहमतीने “एक वेळची बाब” म्हणून शिथीलता देण्यात येत आहे.

८. सदरचा शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने त्यांचे अनौपचारीक संदर्भ क्र.९८/१४३१, दि.३१.०३.२०२२ व वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचे अनौपचारिक संदर्भ, क्र.१४५/२०२३/व्यय-२ दि.२१.०२.२०२३ तसेच क्र. ३३/२०२३/को.प्र. ५, दि.२१.०२.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक २०२३०२२४१३४३४१४५०१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

CHANDRAKALA DEVRAM GAVIT

Digitally signed by CHANDRAKALA DEVRAM GAVIT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=db6efff5f9cbf5f55184ebe2b33934e3a1ad06cbfbad22ff0cbcf88f3c89e1e4, pseudonym=6AC1004D14020B1CF4AC873549BD26748DFEB090, serialNumber=B16E6FECB684A6091AF2BD729716C8F32004FE5EF01B9D220C1A6D0EDDC63E52, cn=CHANDRAKALA DEVRAM GAVIT
Date: 2023.02.24 13:50:56 +05'30'

**( चंद्रकला गावित)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री (महसूल, पशुसंवर्धन व दुग्ध व्यवसाय विकास) यांचे खाजगी सचिव , मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, औंध, पुणे
३. जिल्हाधिकारी, अहमदनगर
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अहमदनगर
५. प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त, नाशिक विभाग, नाशिक
६. अतिरिक्त आयुक्त पशुसंवर्धन, पशुसंवर्धन आयुक्तालय, पुणे
७. जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त,अहमदनगर
८. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद, अहमदनगर
९. उद्योग उपसंचालक (तांत्रिक) गट-अ तथा महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, अहमदनगर
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर
११. अवर सचिव, पदुम-३/पदुम-४, कक्ष अधिकारी पदुम-१/१६, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (पदुम -२).